राज्यातील पोलीस नियंत्रण कक्षांचे आधुनिकीकरण प्रकल्प (डायल-११२) राबविण्यासाठी प्रकल्प सल्लागार म्हणून नियुक्त केलेल्या मे. अर्नेस्ट अँड यंग या कंपनीला मुदतवाढ देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीसीटी-३६१६/प्र.क्र.१४०/भाग-१/पोल-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, २ रा मजला, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १६ मार्च, २०२२

**वाचा :**

१. माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, शासन निर्णय क्रमांक : GAD-मातंस ०८०/ ४/ २०१४-O/O DIRECTORATE OF IT-DIT (MH), दि ०१.०७.२०१४, दि.०९.१०.२०१७ व दि.०९.०५.२०१९.
२. गृह विभाग, शासन पत्र क्र. CCT-३६१३/CR-१४०/Part-१/Pol-३, दि.०५.११.२०१६.
३. गृह विभाग, कार्यादेश क्र. CCT-३६१३/CR-१४०/Part-१/Pol-३, दि.०६.०१.२०१७ व दि.२७.१०.२०१७.
४. गृह विभाग, शासन पत्र क्र. CCT-३६१६/CR-१४०/Part-१/Pol-३, दि.३०.०३.२०१९.
५. प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या (PIC) दि.२४.१०.२०१६ व दि.३१.०८.२०१७ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
६. गृह विभाग, शासन निर्णय क्र.सीसीटी-३६१६/प्र.क्र.१४०/भाग-१, दि.२०.१२.२०२१.
७. अपर पोलीस महासंचालक (नि. व स.), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे क्र.पोमसं/ १७/६१६२/MERS (डायल-११२)/८१/२०१७-२०, दि.२२.११.२०२१.
८. अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दि.०५.०१.२०२२ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :**

राज्यातील पोलीस नियंत्रण कक्षांचे आधुनिकीकरण प्रकल्प (डायल-११२) राबविण्यासाठी प्रकल्प सल्लागार म्हणून मे. अर्नेस्ट अँड यंग या सल्लागार कंपनीची संदर्भ क्र.२ येथील शासन पत्रान्वये २ वर्षासाठी नियुक्ती करण्यात आली. तसेय संदर्भ क्र.३ येथील कार्यादेशान्वये डायल-११२ प्रकल्पासाठी मे. अर्नेस्ट अँड यंग यांनी करावयाच्या कामाचे टप्पे निश्चित करण्यात आले. तद्नंतर वेळोवेळी कालावधी वाढवून देण्यात आला व संदर्भ क्र.६ येथील शासन निर्णयान्वये मे. अर्नेस्ट अँड यंग या कंपनीच्या एका वरिष्ठ सल्लागारास दि.१६.०५.२०२० ते दि.३१.०३.२०२१ पर्यंत दरमहिना-दरमाणुस (Man-Month) तत्वानुसार मुदतवाढ देण्यात आली. अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दि.०५.०१.२०२२ रोजीच्या बैठकीत प्रकल्प सल्लागार यांना मुदतवाढ देण्याचा निर्णय घेण्यात आला. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

राज्यातील पोलीस नियंत्रण कक्षांचे आधुनिकीकरण प्रकल्प (डायल-११२) राबविण्यासाठी मे. अर्नेस्ट अँड यंग या कंपनीच्या १७ man-months (१० वरिष्ठ सल्लागार व ७ सल्लागार) सल्लागारांना दि.०१.०४.२०२१ ते दि.३१.१२.२०२१ पर्यंत दरमहिना-दरमाणुस (Man-Month) तत्वानुसार मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. उपरोक्त सल्लागारांना देण्यात येणारे मानधन व इतर भत्ते माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथे नमुद दि.०९.०५.२०१९ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार देय राहील तथापि माहिती व तंत्रज्ञान विभागाने सल्लागारांच्या मानधनासंदर्भात भविष्यात काही सुधारणा केल्यास सदर सुधारणा उपरोक्त सल्लागारांना लागु राहतील.

३. (१) सदर प्रकल्प सल्लागारांना देण्यात येणारे मानधन हे प्रती-व्यक्ती प्रती-माह केलेल्या कामानुसार (Man-Month Deployment Basis) असेल. (२) प्रतिदिन सल्लागारांचे काम हे ८ तास कालावधीचे असावे. (३) सल्लागारांनी केलेले काम प्रकल्पाची तांत्रिक सल्लागार समिती प्रमाणित करेल व त्यानंतर अंमलबजावणी समिती (PIC) ही स्वाक्षरी करुन शासनास सादर करेल. त्यानंतर शासनस्तरावर त्यासंबंधीत देयक मंजूर करण्याची कार्यवाही करण्यात येईल. सल्लागाराची देयके शासनास सादर करताना सल्लागाराने महिन्याच्या कालावधीत केलेल्या कामाचा तपशील/अहवाल शासनास सादर करणे आवश्यक आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३१६१८१७२९८६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RUPALI SANJOG KABARE

Digitally signed by RUPALI SANJOG KABARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=825ec39543f0d33deccec30f6ca54b1adc430443efec55f07e98dc173423779d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5CB43A03D973FF96AABBF02A74864A4681399FE663D8FBDE0441A596BEB3ACDD, cn=RUPALI SANJOG KABARE
Date: 2022.03.16 18:20:29 +05'30'

**( रुपाली कबरे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री, गृह यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
७. अपर पोलीस महासंचालक (नि. व स.), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. प्रधान महालेखाकार (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय, मुंबई.
१३. मे. अर्न्स्ट अँड यंग कंपनी, १४ वा मजला, द रुबी, २९, सेनापती बापट मार्ग, दादर (पश्चिम), मुंबई-४०० ०२८.
१४. कक्ष अधिकारी (व्यय-७ / वित्तीय सुधारणा-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. अर्थ-१ शाखा, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवड नस्ती/पोल-३.